**किशनलाल जालान धर्मार्थ आयुर्वेद औषधालय, मालाड, मुंबई या संस्थेचा सन २०१३-१४ या आर्थिक वर्षाच्या लेखा परिक्षित अहवालावर आधारित आवर्ती अनुदानाचा अंतिम हप्त्याचे अनुदान निर्धारणानुसार देय असलेला अंतिम हप्ता मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयुष-२०१८/प्र.क्र.१७५/१८/आयु-२,**
गो.ते. रुग्णालय आवार, गो.ते.संकुल, ९ वा माळा, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: १६ जानेवारी, २०१९

**वाचा:** संचालक आयुष यांचे पत्र क्र.आसंमुं/स.अनु/किजाधआऔमामुं/अंनिस/२०१३-१४/आयु-७(३)/ २०१८/१२८४२, दि.०६ ऑगस्ट, २०१८.

**प्रस्तावना :**

खाजगी धर्मार्थ संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या आयुर्वेद दवाखान्यांना वेतन, औषध खरेदी व अन्य खर्च भागविण्यासाठी प्रत्यक्ष खर्चाच्या २५ % अनुदान देण्याच्या शासन योजनेनुसार राज्यातील किशनलाल जालान धर्मार्थ आयुर्वेदिक औषधालय, मालाड, मुंबई या संस्थेस सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.२८०४/३३, दि.३१/०८/१९३९ अन्वये मान्य खर्चाच्या २५ % किंवा तुट यापैकी कमी असेल त्या रक्कमेइतके अनुदान अनुज्ञेय आहे. त्यानुसार किशनलाल जालान धर्मार्थ आयुर्वेदिक औषधालय, मालाड,मुंबई या संस्थेस सन २०१३-१४ या आर्थिक वर्षाच्या लेखापरीक्षित अहवालावर रु.१,८३,६८४/- इतके अनुदान देय होत आहे. त्यानुसार सदर संस्थेस अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

किशनलाल जालान धर्मार्थ आयुर्वेदिक औषधालय, मालाड,मुंबई या संस्थेच्या सन २०१३-१४ या आर्थिक लेखा परीक्षित अहवालावर रु.१,८३,६८४/- (रु. एक लाख, त्र्याऐंशी हजार, सहाशे चौऱ्याऐंशी फक्त) इतके अनुदान मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर प्रस्तावावर होणारा रु.१,८३,६८४/-इतका खर्च सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर केलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा व सदर खर्च खालील लेखाशीर्षाखाली टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-१ (कार्यक्रम/Scheme)
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०२ - नागरी आरोग्य सेवा - इतर वैद्यक पद्धती
१०१ - आयुर्वेदिक
(०४) (०१) - मालाड, मुंबई येथील किशनलाल जालान धर्मार्थ आयुर्वेदिक औषधालयास सहाय्यक अनुदान (२२१० १९१२)
(३१) - सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)

सदर रक्कमेच्या आहरण व संवितरण यासाठी सहाय्यक संचालक,आयुष,नवी मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक : विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५/०५/२००९ मधील अनुक्रमांक २७, नियम क्रमांक १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११६१२२५०६५११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashvini Arvind Moon

Digitally signed by Ashvini Arvind Moon
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2799daf590db9c1313739c735ee1a1507d65ff767935a37efc0ea83014f7080c, serialNumber=5b80e03b84ee853744d97398ce98dea1b571f29e3698196de1076d43e3407b3b, cn=Ashvini Arvind Moon
Date: 2019.01.16 17:39:42 +05'30'

**अश्विनी मुन**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, आयुष संचालनालय,मुंबई-४०० ००१.
२) महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ) १, महाराष्ट्र,मुंबई
३) वित्त विभाग ( व्यय-१३ )/( अर्थ-८ ), मंत्रालय,मुंबई.
४) सहाय्यक संचालक आयुष, नवी मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) कक्ष अधिकारी ( अलेप ), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,मुंबई
७) निवडनस्ती, आयु-२